**धारावी पुनर्विकास प्रकल्प- सचिव समितीच्या अधिकारात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : धापुप्रा-२०२२/प्र.क्र.११६/झोपसु**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १३ मार्च, २०२४

वाचा : १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक झोपुयो-२००३/प्र.क्र.१८९/झोपसु-१, दिनांक ०४ फेब्रुवारी, २००४
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक झोपयो-२००८/प्र.क्र.८८/झोपसु-१ अ, दिनांक २४ ऑक्टोबर, २००८
३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक धापुप्रा-२०१८/प्र.क्र.९०/झोपसु, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१८
४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक धापुप्रा २०२२/प्र.क्र.८७/झोपसु, दिनांक २८ सप्टेंबर, २०२२
५) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक धापुप्रा २०२२/प्र.क्र.११६/झोपसु, दिनांक १२ डिसेंबर, २०२२
६) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक धापुप्रा २०२२/प्र.क्र.१२३/झोपसु, दिनांक १३ जुलै, २०२३
७) मंत्रिमंडळ बैठक दिनांक ०५.०२.२०२४ च्या बैठकीतील विषय क्र. १६ च्या संदर्भात झालेला मंत्रिमंडळाचा निर्णय

**प्रस्तावना :**

धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी आंतरराष्ट्रीय जाहीरात देऊन विकासकांकडून प्रस्ताव मागविण्यात येऊन अशा प्राप्त झालेल्या प्रस्तावांची झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणामार्फत छाननी करुन याबाबत अंतिम निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली दि. ०४.०२.२००४ च्या शासन निर्णयाद्वारे सचिव समिती गठीत करण्यात आली होती. त्यानंतर गृहनिर्माण विभाग शासन निर्णय दि.२४.१०.२००८ अन्वये या सचिव समितीचा विस्तार करुन पुन:गठण करण्यात आले आहे. तसेच सदर समितीमधील काही सदस्यांना वगळून दिनांक १२ डिसेंबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये सचिव समितीची पुर्नरचना करण्यात आली आहे.

धारावीचा एकत्रितरित्या सर्वंकश विकास करण्याच्या उद्देशाने विशेष हेतू कंपनी (SPV) स्थापन करण्याबाबत शासनाने दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेतला. तसेच दिनांक २८ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये या प्रकल्पाची व्याप्ती वाढविण्यात आलेली आहे. धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये वाढ झाली असल्याने धारावी पुनर्विकास प्रकल्पाची जलदगतीने अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यकतेनुसार वेळोवेळी धोरणात्मक निर्णय घेणे गरजेचे आहे. मा. मंत्रिमंडळाने दिनांक ०५.०२.२०२४ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार दिनांक ०४.०२.२००४ च्या शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या व दिनांक १२ डिसेंबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये पुर्नगठीत केलेल्या सचिव समितीच्या अधिकार कक्षेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता यापुढे धारावी पुनर्विकास प्रकल्पाकडून मुंबई शहर व मुंबई महानगर प्रदेश परिसरातील जमिनीची आवश्यकता असलेल्या प्रस्तावावर निर्णय घेण्यासाठी व धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या जलद अंमलबजावणीसाठी सर्व धोरणात्मक निर्णय घेण्याच्या अनुषंगाने दिनांक ०४.०२.२००४ च्या शासन निर्णयान्वये मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या सचिव समितीस प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१३१७४४४१२८०९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसान व नावाने,

SUNIL BABURAO TUMBARE

Digitally signed by SUNIL BABURAO TUMBARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=6db48f86ab804a2f08a49a53d5dddd92f7dca38c78a21ad05da451e33813593c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4E35B68528305D98FA8F8D62D295D490751E30D94B9E433CB0CC3714A0098215, cn=SUNIL BABURAO TUMBARE
Date: 2024.03.13 17:54:06 +05'30'

**( सु. बा. तुंबारे )**
**उप सचिव, गृहनिर्माण विभाग.**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
७) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
८) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, नगर विकास विभाग(१/२), मंत्रालय, मुंबई,
९) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव, विधी व न्याय, मंत्रालय, मुंबई,
१२) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई,
१३) सचिव प्रशासकीय पुनर्रचना व विशेष प्रकल्प सामान्य प्रशासन विभाग,मुंत्रालय, मुंबई,
१४) महानगर, आयुक्त, एमएमआरडीए,मुंबई,
१५) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई,
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई,
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्विकास प्रकल्प, मुंबई,
१८) उप जिल्हाधिकारी, मुंबई शहर,
१९) अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का), पुर्व/पश्चिम उपनगरे,
२०) सर्व मंत्रालयीन विभाग,
२१) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग,
२२) निवड नस्ती (झोपसु)